लाभार्थ्यांच्या पसंतीनुसार थेट लाभ हस्तांतरण [DBT (Cash or kind)]प्रकल्पाची प्रायोगिक तत्वावर अंमलबजावणी संदर्भात तपशिलवार मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः डीबीटी-२०१६/प्र.क्र.११/ना.पु.**२७,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
दिनांक: २९ सप्टेंबर, २०१८.

**पहा :-** १) शासन निर्णय अ.ना.पु. व ग्रा.सं. वि. क्रं. डीबीटी-२०१८/प्र.क्र.११/नापु २७ , दि. २१ ऑगस्ट, २०१८
२) केंद्र शासनाचे Cash Transfer of Food Subsidy Rules, 2015

## परिपत्रक:-

सार्वजनिक वितरण व्यवस्थेखालील केरोसिन व अन्नधान्यावर देण्यात येणारे अनुदान पात्र लाभार्थ्यांपर्यंत पोहोचावे यास्तव राज्य शासनाने Direct Benefit Transfer (Cash) व Direct Benefit Transfer (Kind) या पर्यायांची सांगड घालून लाभार्थ्यांना दोहोंपैकी त्याच्या पसंतीचा एक पर्याय निवडण्याची संधी देण्याचा निर्णय वित्त विभागाशी चर्चेनंतर दि. २१ ऑगस्ट, २०१८ रोजी घेतला आहे. शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार प्रायोगिक तत्वावरील सदर प्रकल्प अन्नधान्या करीता राबविण्यात येईल. या प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यामुळे आता खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१) ही योजना मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रातील अ परिमंडळातील १/A/१०६/Azad Maidan (PFS ID- 164104500022) व ११/A/६१/Mahalaxmi (PFS ID- 164105000035) स्वस्त धान्य दुकानातून राबविण्यात येईल.

२) योजनेचे स्वरूप पुढील प्रमाणे राहील -

i. शिधापत्रिकाधारकाला अनुज्ञेय धान्य किंवा त्या ऐवजी निर्धारित होणारे अनुदान त्याच्या पसंतीनुसार घेण्याचा पर्याय उपलब्ध राहील.

ii. शिधापत्रिकाधारकास प्रत्येक महिन्याच्या २० तारखेपर्यंत पुढील महिन्याचे लक्ष निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे लाभ मिळण्याकरिता धान्य किंवा रोख अनुदान यापैकी एक पर्याय निवडणे आवश्यक राहील. पर्याय निवडण्याची सुविधा स्वस्त धान्य दुकानाला पुरविलेल्या PoS वर उपलब्ध राहील.

iii. शिधापत्रिकाधारकाने रोख अनुदान स्वीकारण्याचा पर्याय निवडल्यास हे अनुदान शिधापत्रिकाधारक कुटुंबातील महिला कुटुंबप्रमुखाच्या आधार संलग्नित बँक खात्यात जमा करण्यात येईल.

iv. शिधापत्रिकाधारकाने DBT (cash) हा पर्याय निवडला व त्यानंतरच्या महिन्यांसाठी पर्याय निवडला नसल्यास त्याला रोख अनुदान पर्यायानुसार लाभ अनुज्ञेय राहतील.

v. शिधापत्रिकाधारकाने वरील दोन्ही पैकी कोणत्याही पर्यायाची निवड केली नसल्यास त्याला प्रचलित पद्धतीने PoS व्दारे धान्याचे वितरण करण्यात येईल.

vi. रोख रक्कम स्विकारण्याचा पर्याय निवडलेल्या प्रकरणामध्ये, जितक्या धान्याचे वितरण झाले असते व त्या वितरणाबद्दल PoS वरील विक्रीसाठी जितके मार्जिन अनुज्ञेय राहीले असते, तितके मार्जिन स्वस्त धान्य दुकानदारास अनुज्ञेय राहील व ते ऑनलाईन बँक खात्यामध्ये जमा करण्यात येईल.

vii. Cash Transfer of Food Subsidy Rules, 2015 मधील नियम क्रमांक ५ च्या खालील तरतुदीनुसार अनुज्ञेय रक्कम प्रदेय राहील.

**Computation of food subsidy-** The amount of food subsidy payable to a entitled household shall be computed by multiplying entitled quantity of food grains with difference between १.२५ times applicable Minimum Support Price (derived Minimum Support Price in the case of rice) and the Central Issue Prices, or as may be revised from time to time, by the Central Government.)

viii) DBT(cash) हा पर्याय निवडल्यास लाभार्थ्याला खालीलप्रमाणे लाभ अनुज्ञेय राहील.

| अनुज्ञेय धान्य प्रकार | रोख लाभ (रू.) | अंत्योदय लाभार्थी (कि.ग्रॅ) | अनुज्ञेय एकूण रक्कम [DBT (cash) rule प्रमाणे]प्रती कार्डधारक (रु.) | दुकानदाराला मिळणारे कमीशन (रु.) |
|---|---|---|---|---|
| तांदुळ | २६.६६ | १७ | ४५३.२२ | २५.५० |
| गहू | १९.६९ | १८ | ३५४.४२ | २७.०० |
| एकूण | ४६.३५ | ३५ | ८०७.६४ | ५२.५० |

| अनुज्ञेय धान्य प्रकार | रोख लाभ (रू.) | प्रती प्राधान्य कुटूंब लाभार्थी | अनुज्ञेय एकूण रक्कम[DBT(cash) rule प्रमाणे] प्रती लाभार्थी (रु.) | दुकानदाराला मिळणारे कमीशन (रु.) |
|---|---|---|---|---|
| तांदुळ | २६.६६ | २ | ५३.३२ | ३.०० |
| गहू | १९.६९ | ३ | ५९.०७ | ४.५० |
| एकूण | ४६.३५ | ५ | ११२.३९ | ७.५० |

३. या प्रकल्पाच्या वितीय बाबींसाठी वित्तीय सल्लागार व उप सचिव हे नियंत्रक अधिकारी म्हणून कार्यरत राहतील.

४. या प्रकल्पावरील खर्च पुढील लेखाशिर्षातून खर्च करावा-

**१) DBT (cash) अनुदानवरील खर्च –**

मागणी क्रमांक ४, ४४०८ अन्न, साठवण व वखार यावरील भांडवली खर्च ५० इतर खर्च , (०२) (०८) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेखालील खरेदी तरतुद- मुंबई शहर (अनिवार्य) (४४०८०३०८)

**२) स्वस्त धान्य दुकानदाराच्या मार्जिनवरील खर्च –**

मागणी क्रमांक ४, ४४०८ अन्न, साठवण व वखार यावरील भांडवली खर्च २१, पुरवठा व सामग्री , (०२) (१०) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेखालील अन्न धान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च- मुंबई शहर (अनिवार्य) (४४०८०३२६)

३) वरील बाबींवरील खर्च लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचे नावे चालू बँक खाते (Current Bank Account) उघडून त्यामधून खर्ची टाकण्यात येईल.

५. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी HDFC ही बँक अग्रणी बँक (Lead Bank) म्हणून काम करेल. शासनाकडून या बँके बरोबर सामंजस्य करार करण्यात येईल.

६. या प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी National Informatics Centre (NIC) यांच्याकडून राज्य शासनास आवश्यक ते तांत्रिक सहकार्य पुरवविण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.३५७/२०१८/कोषा प्रशा-५, दिनांक २१.०९.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२९१६२२१०९२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Hamid Husain Ghulam Ansari
Date: 2018.09.29 16:27:01 +05'30'

**( हामिद अन्सारी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.
२. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई.

३. सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा.

४. सर्व सन्माननिय विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद.

५. सर्व जिल्हाधिकारी,

६. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.

७. सर्व उप आयुक्त (पुरवठा).

८. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.

९. सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी.

१०.सर्व उप नियंत्रक शिधावाटप,मुंबई.

१०. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.

११. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.

१२. निवडनस्ती.